महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेच्या
निधीतून आर्थिक सहाय्य.
निधी वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पुमाप्र २०१६ /प्र.क्र.३१ /क्रीयुसे -३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : ३० मार्च, २०१७.

वाचा:-

१) शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्र. राक्रीधो १०९६/प्र.क्र.३३०/ क्रीयुसे-१ दि. ३१ जुलै, १९९७.
२) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.निवियो २०१६/प्र.क्र.२९/क्रीयुसे-३ दि. २५ नोव्हेंबर, २०१६.
३) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थसं-३, दि.२० एप्रिल, २०१६
४) क्रीडा व युवक सेवा पुणे यांचे पत्र क्रमांक. मराक्रीप/स्पर्धाअनु/२०१६-१७/का-६ दि. ११ जानेवारी, २०१७.

**प्रस्तावना: -**

महाराष्ट्र राज्यातील क्रीडा संस्कृतीची जोपासना करण्यासाठी तसेच क्रीडा क्षेत्रात कार्यरत असणाऱ्या पंजीबध्द संस्था, मंडळे, संघटना यांना महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेच्या माध्यमातून संदर्भाधिन क्र. १ अन्वये आर्थिक मदत देण्यांत येते. सन २०१६-१७ या कालावधीत प्रस्तुत योजनेच्या अंमलबजावणीकरिता योजनेतर लेखाशिर्ष "२२०४ १५५१" अंतर्गत व योजनांतर्गत लेखाशिर्ष "२२०४ १९४३" अंतर्गत उपलब्ध असलेले अनुदान संस्थांना वितरीत करण्याची बाब या नस्तीच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

योजनांतर्गत लेखाशिर्ष "२२०४ १९४३" अंतर्गत अर्थसंकल्पित करण्यांत आलेल्या निधीपैकी रु. ३.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यांस व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. योजनेतर लेखाशिर्ष "२२०४ १५५१" अंतर्गत संदर्भाधिन शासन निर्णय क्रमांक निवियो २०१६/ प्र.क्र.२९/क्रीयुसे-३ दि. २५ नोव्हेंबर, २०१६ अन्वये अर्थसंकल्पित रु. ५.०० लक्ष पैकी रु. ४.०० लक्ष इतकी रक्कम वितरीत करण्यांत आलेली आहे.

३. या शासन निर्णयाच्या परिच्छेद १ मधील रु. ३.०० लक्ष आणि परिच्छेद २ मधील ४.०० लक्ष असे एकूण रु. ७.०० लक्ष या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट - अ मध्ये नमूद केल्याप्रमाणे वितरीत करण्यांस याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

४. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्रमांक : ई-३, २२०४ क्रीडा व युवक सेवा-१०४, (०२)(०३) महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेमार्फत नोंदणीकृत क्रीडा संस्थांना सहायक अनुदान (राज्य) (२२०४ १९४३) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखालील सन २०१६-१७ करीता मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

५. वित्त विभागाच्या दि.२०/०७/२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार प्रमाणित करण्यांत येते की,:-

५.१. वित्त विभागाच्या दि.२०/०४/२०१६ च्या शासन परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.

५.२. यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

५.३. ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातंर्गत गतवर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५.४. दि.२४/०७/२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

५.५. परिपत्रकातील “अ” व “ब” ची पूर्तता होत आहे.

६. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २०/०४/२०१६ व दि. २४/०७/२०१५ च्या परिपत्रकातील सूचनानूसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (क्रीडा )यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२०/०४/२०१६ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील परिच्छेद ७ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १,२,३,४,५,६,७ व ८ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१३०२४६९१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=862038e0fbcf90998980c1f9241c4bdd9f61a60c9a06a5fe43c17f10b41e85f5, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2017.03.30 13:06:11 +05'30'

**( कि. ल. संखे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा )यांचे खाजगी सचिव
२) मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
७) वरीष्ठ कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे (संचालनालयामार्फत)
८) निवडनस्ती, क्रीयुसे-३.

## परिशिष्ट -अ

| अ.क्र | संस्थेचे नाव | मंजूर केलेली रक्कम | लेखाशिर्ष |
|---|---|---|---|
| १ | नारायण व्यायामशाळा व क्रीडा मंडळ, औरंगाबाद | रु.२,००,०००/- | २२०४-१५५१ योजनेतर |
| २ | सोलापूर ॲमॅच्युअर खो-खो असोसिएशन, सोलापूर | रु.२,००,०००/- | |
| ३ | सोलापूर ॲमॅच्युअर खो-खो असोसिएशन, सोलापूर | रु.१,००,०००/- | २२०४-१९४३ योजनांतर्गत |
| ४ | श्री. तात्यासाहेब कोरे क्रीडा प्रबोधिनी, वारणानगर, ता. पन्हाळा, जि. कोल्हापूर | रु.१,००,०००/- | |
| ५ | यवतमाळ जिल्हा सॉफ्टबॉल असोसिएशन, दहिवळकर प्लॉट, दाते चौक, यवतमाळ | रु.१,००,०००/- | |
| | **एकूण.....** | **रु.७,००,०००/-** | |